विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांच्याकरीता
०२ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२४/प्र.क्र.३८/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०२ मे, २०२४.

**संदर्भ:**- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/आ.पु.क., दि.२७ जानेवारी, २०१७.
२) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. अअ/मुंमं/परिमंडळ/का-७/२५७७, दि.२१ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

सर्वश्री सुनिल ज्ञानोबा पाटील व श्रेयस संजय महाजन, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांची महालेखाकार (लेखा व हकदारी)-II, महाराष्ट्र, नागपूर यांच्या कार्यालयात नव्याने नियुक्ती करण्यात आलेली आहे. सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन यांना परिविक्षाधीन कालावधीत वेतन व भत्ते अदा करण्यासाठी विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांची ०२ अधिसंख्य पदे परिविक्षाधीन कालावधीकरिता निर्माण करुन सेवार्थ प्रणालीमध्ये समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र, नागपूर कार्यालयाकडे नव्याने नियुक्त करण्यात आलेले सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) [Central Civil Services (Revised Pay) Rules, २०१६ in the Level ६ (Six) in the Pay Matrix] यांना मासिक वेतन व भत्ते मिळण्यासाठी परिविक्षाधीन कालावधीकरिता ०२ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. विभागीय लेखापाल या पदाची भरती प्रक्रिया स्टाफ सिलेक्शन कमिशनतर्फे करण्यात आली असून, सदर पदाचा परिविक्षाधीन कालावधी दोन वर्षांचा आहे. विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) या पदावर रुजू झालेले सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन यांची सेवाविषयक माहिती पुढीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | शासन सेवेत रूजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त होण्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | श्री. सुनिल ज्ञानोबा पाटील | ०१/०२/२०२४ | ३१/०१/२०२६ |
| २ | श्री.श्रेयस संजय महाजन | ०१/०२/२०२४ | ३१/०१/२०२६ |

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/ प्र.क्र.७/१६/आ.पु.क., दि.२७ जानेवारी, २०१७ मधील तरतुदीनुसार सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांच्याकरीता ०२ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली असून, सदर अधिसंख्य पदे सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त झाल्याच्या दिनांकानंतरच्या दिनांकास आपोआप संपुष्टात येतील.

४. सर्वश्री सुनिल पाटील व श्रेयस महाजन यांच्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाचा समावेश सेवार्थ प्रणालीमध्ये महालेखाकार (लेखा व हकदारी)-II महाराष्ट्र, नागपूर यांच्या आहरण व संवितरण अधिकारी सांकेतांक ४६०१००३६९२ मध्ये करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच या बाबीवरील खर्च " मागणी क्र. एच-०६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, ८० सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन (योजनेतर) (०८),

कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई (०८) (०२) कार्यान्वयन (२०५९-१२४५) ” या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०५०२१६५६५६९६१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.05.02 17:09:26 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, मुंबई.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बांधकाम भवन, मर्झबान पथ, मुंबई.
३) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई.

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (रस्ते)/ सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-११/ आकृतीबंध पुनर्रचना कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन सेवा-४/अर्थसंकल्प-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती.